**<u>मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी पदावर</u>**
**<u>राज्य सेवा गट-ब मध्ये सरळसेवा भरती</u>**
**<u>राज्यसेवा (मुख्य) परीक्षा - १९९९</u>**
**वेतननिश्चितीच्या सुधारित तरतुदीबाबत**

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः कअनि-१०१८/प्र.क्र.५८/१४-ब

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०१ डिसेंबर, २०१८

<u>वाचा -</u> १) सा.प्र.वि. शा.नि. क्र. सीसीए -१७००/प्र.क्र.२३/२०००/१४ब, दि.२०.०६.२००५
२) सा.प्र.वि. शा.नि. क्र. सीसीए -१७००/प्र.क्र.२३/२०००/१४ब, दि.१३.०२.२००६
३) संबंधित कक्ष अधिकारी यांचे दिनांक ०५.०३.२०१८ रोजीचे निवेदन.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने राज्य सेवा (मुख्य) परीक्षा, १९९९ अंतर्गत मंत्रालयीन कक्ष अधिकारी पदावर सरळसेवेने नियुक्ती करण्यासाठी ४१ उमेदवारांची शिफारस केली होती. सदर उमेदवारांना कक्ष अधिकारी पदावर विविध मंत्रालयीन विभागांत नियुक्ती देण्याच्या दृष्टीने कार्यवाही सुरू करीत असताना वित्त विभागाच्या क्रमांक -असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०.०९.२००१ च्या शासन निर्णयान्वये सरळसेवेने सेवाभरती करण्यावर निर्बंध घालण्यात आले व परिणामी सर्व मंत्रालयीन विभागातील सर्व पदांसमवेत कक्ष अधिकारी या संवर्गातील पदांचाही आढावा घेण्याचे ठरविण्यात आले. सदर आढावा पूर्ण झाला नसल्यामुळे सदरहू ४१ उमेदवारांना मंत्रालयीन विभागात कक्ष अधिकारी पदावर नियुक्ती न देता त्यांना इतर शासकीय कार्यालयांमध्ये समकक्ष पदांवर नियुक्ती देण्यात यावी असा निर्णय घेण्यात आला. या ४१ उमेदवारांपैकी ३३ उमेदवारांना “मुख्याधिकारी” नगरपालिका/परिषद व ८ उमेदवारांना “तालुका निरीक्षक भूमि अभिलेख” या पदांवर अनुक्रमे नगरविकास विभाग व महसूल व वन विभागामार्फत २००२ मध्ये नियुक्त्या देण्यात आल्या होत्या. त्यानुसार प्रस्तुत उमेदवार संबंधित पदांवर रूजू झाले.

२. या निर्णयाच्या विरोधात काही उमेदवारांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण येथे याचिका दाखल केल्या असता मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने या उमेदवारांच्या याचिका फेटाळल्या. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या निर्णयाविरूध्द त्याच उमेदवारांनी मा.मुंबई उच्च न्यायालयात दोन याचिका दाखल केल्या होत्या. सदर याचिकांवर मा.मुंबई उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयात मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिलेल्या निर्णयात हस्तक्षेप करण्याबाबत कोणतेही कारण नसल्याचे नमूद केले, तसेच सन १९९९ च्या उपरोक्त तुकडीतील उमेदवारांनी शासनाकडे अर्ज केल्यास त्यांची बदली कक्ष अधिकारी पदावर करण्याबाबत सहानूभूतीपूर्वक विचार करण्याचे निदेश दिले.

३. त्या अनुषंगाने सन १९९९ च्या उपरोक्त तुकडीतील काही उमेदवारांनी शासनाकडे अर्ज सादर केले. त्यानुसार एक विशेष बाब म्हणून संदर्भाधीन दिनांक २०.०६.२००५ रोजीच्या शासन निर्णयान्वये ०८ उमेदवारांची व दिनांक १३.०२.२००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये ०७ उमेदवारांची अशा एकूण १५ उमेदवारांची मंत्रालयीन विभागात परिविक्षाधीन कक्ष अधिकारी म्हणून रू.६५००-२००-१०५०० या वेतनश्रेणीत विहीत अटींच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात आली. सदर १५ उमेदवारांपैकी नियुक्ती स्विकारलेल्या व सध्या कार्यरत असलेल्या ११ कक्ष अधिका-यांची नावे विवरणपत्र "अ" मध्ये नमूद करण्यात आली आहेत.

४. मंत्रालयीन कक्ष अधिकारी पदावर रूजू करून घेतलेल्या उपरोक्त ११ अधिका-यांच्या कक्ष अधिकारी पदावरील वेतननिश्चितीसंदर्भात सा.प्र.वि. शासन निर्णय, दिनांक २०.०६.२००५ व १३.०२.२००६ मधील क्र. ३ येथे पुढील अट नमुद करण्यात आली आहे :-

"उपरोक्त उमेदवारांचे कक्ष अधिकारी संवर्गातील वेतन कक्ष अधिकारी संवर्गाच्या वेतनश्रेणीच्या सुरूवातीच्या टप्प्यावरच निश्चित होईल. या उमेदवारांना पूर्वीच्या पदावरील परिविक्षा कालावधी, वेतन इत्यादींचा लाभ देय राहणार नाही. तसेच या आठ उमेदवारांची आपआपसातील ज्येष्ठता त्यांच्या गुणवत्ता क्रमानुसार राहील. मात्र कक्ष अधिकारी संवर्गातील सामाईक ज्येष्ठता सदर उमेदवार कक्ष अधिकारी पदावर ज्या दिवशी हजर होतील त्या दिवसापासून विचारात घेण्यात येईल. कार्यमुक्त झालेल्या उमेदवारांना त्यांच्या यापूर्वीच्या सेवेचा लाभ फक्त निवृत्तीवेतनासाठी अर्हताकारी सेवा आणि रजा यासाठीच मिळेल. या अनुषंगाने उपरोक्त अटी व शर्ती मान्य असल्यास संबंधित उमेदवारांनी हमीपत्र प्रथम भरून देणे आवश्यक राहील."

५. यासंदर्भात संबंधित कक्ष अधिका-यांनी संदर्भ क्र.३ येथील निवेदनाद्वारे केलेल्या विनंतीस अनुसरून तपासणी केली असता, उपरोक्त तरतूद म.ना.से.(वेतन) नियमांशी विसंगत असल्याने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

१) उपरोक्त अट क्र.३ मधील वेतन निश्चितीशी संबंधित "*उपरोक्त उमेदवारांचे कक्ष अधिकारी संवर्गातील वेतन कक्ष अधिकारी संवर्गाच्या वेतनश्रेणीच्या सुरवातीच्या टप्प्यावरच निश्चित होईल* "ही तरतूद आता वगळण्यात येत असून त्याऐवजी ***"शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २३.०३.१९९४ मधील तरतुदींनुसार एक विशेष बाब म्हणून संबंधित ११ अधिका-यांचे कक्ष अधिकारी पदावरील वेतन निश्चित करण्याबाबत संबंधित प्रशासकिय विभागाकडून उचित कार्यवाही करण्यात यावी"***

२) ***त्याचप्रमाणे "संबंधित ११ अधिका-यांची कक्ष अधिकारी पदावरील वेतन निश्चिती आवश्यकतेनुसार वित्त विभागाचे अभिप्राय घेऊन संबंधित प्रशासकीय विभागांनी करावी." अशी सुधारित तरतूद करण्यात येत आहे.***

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४२३/१८/सेवा-३, दिनांक २८.०९.२०१८ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०११५११२३९३०७ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.12.01 17:02:11 +05'30'

**( ग.भि.गुरव )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अ.मु.स./प्र.स./सचिव,संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
२. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)
४. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
५. महालेखापाल-१, (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. कार्यासन अधिकारी (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. संबंधित कक्ष अधिकारी (संबंधित विभागामार्फत)
१०. निवडनस्ती.

**सा.प्र.वि. शा.नि.क्र.कअनि -१०१८/प्र.क्र.५८/१४ब, दिनांक ०१.१२.२०१८, सोबतचे विवरणपत्र अ**

| अ.क्र. | कक्ष अधिका-यांची नावे | सध्याचा विभाग |
|---|---|---|
| १ | श्री. अ.व्यं.जेवळीकर | गृह विभाग |
| २ | श्रीमती वै.म.सुळे | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ३ | श्री.स.अ.सावंत | कृषि व पदुम विभाग |
| ४ | श्री.वि.स.चव्हाण | नगरविकास विभाग |
| ५ | श्री.अ.म.कवडे | नगरविकास विभाग |
| ६ | श्रीमती अ.का.खानविलकर | सामान्य प्रशासन विभाग |
| ७ | श्रीमती मृ.सं.देशपांडे | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ८ | श्रीमती प्रि.र.छापवाले | नियोजन विभाग |
| ९ | श्री.रा.चौ.सरवदे | उच्च व तंत्रशिक्षण विभाग |
| १० | श्रीमती ने.प्र.मानकामे | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग |
| ११ | श्री.सु.पा.पांढरे (अपंग) | महसूल व वन विभाग |

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.12.01 17:03:24 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन